राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत किटकनाशके/ अळीनाशके खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०१८/३७६/प्र.क्र. २२५/आरोग्य-८**
नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपांउंड,
कॉम्पलेक्स बिल्डींग, १० वा मजला, मुंबई ४०० ००१.
दिनांक: २२ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :-

१) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/साथरोग कक्ष-६/अळीनाशके व किटकनाशके प्रशा.मान्यता/५३६/सन १८-१९, दि. २८.०८.२०१८.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.७.२०१७.

प्रस्तावना :-

राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत किटकनाशके /अळीनाशके खरेदी करण्यासाठी केंद्र पुरस्कृत योजना (राज्यहिस्सा) सांकेतांक क्रमांक २२१०५१५७ राष्ट्रीय हिवताप निर्मूलन कार्यक्रम या योजनेमध्ये रुपये ५,०८,००,०००/- व राष्ट्रीय हत्तीरोग नियंत्रण कार्यक्रम लेखाशीर्ष २२१०५१६६ या योजनेमध्ये रुपये ७७,००,०००/- इतके अर्थसंकल्पीत अनुदान तसेच सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात जिल्हावार्षिक योजना टी ०९ अंतर्गत उपयोजना सांकेतांक क्र.टीआर २२०००२ अंतर्गत रक्कम रु.७,४४,१५,०००/- व उपयोजना सांकेतांक क्र.टीआर-२२०००५ अंतर्गत रु.१,४०,५२,०००/- इतके मंजूर अनुदानातून अळीनाशके व किटकनाशके खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत संदर्भीय पत्रान्वये प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानूसार राज्यातील आरोग्य संस्थांसाठी अळीनाशके व किटकनाशके खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आरोग्य सेवा संचालनालयाने संदर्भीय दिनांक २८.८.२०१८ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने राज्यातील आरोग्य संस्थांकरिता सोबतच्या विवरणपत्रात दर्शविण्यात आल्याप्रमाणे किटकनाशके व अळिनाशके खरेदी करण्यासाठी रुपये ६,७१,६५,६८८/-( रुपये सहा कोटी एकात्तर लाख पासष्ट हजार सहाशे अठयाऐंशी फक्त) इतकया खर्चास जाहिर निविदा प्रक्रिया करण्यास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | साहित्याचा तपशिल | प्रति लिटर किंमत (अंदाजित) | प्रस्तावित खरेदी ( लिटरमध्ये ) | एकूण अपेक्षित खर्च |
|---|---|---|---|---|
| १ | टेमिफॉस ५०% ई.सी. | रु. ६००.३७ | १८८०० | रु. १,१२,८६,९५६/- |
| २ | पायरेथ्रम एक्स्ट्रक्ट २ टक्के | रु.१४५७/- | १०७७६ | रु. १,५७,००,६३२/- |
| ३ | बीटीआय पावडर | रु. ९९१/- प्र.कि.<br>रु. ९९१/- प्र.कि. | जिवायो-१२०००<br>राज्य- १७१०० | रु,१,१८,९२,०००/-<br>रु,१,६९,४६,१००/- |
| ४ | सिंथेटिक पायरेथ्राईड १० टक्के (लॅम्बडा पावडर) | रु. ३१५/- प्र.कि. | ३६००० लिटर | रु.१,१३,४०,०००/- |
| | | | **एकूण** | **रु,६,७१,६५,६८८/-** |

**अटी :-**

१) सदरहू अळिनाशके व किटकनाशके यांची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी.

२) सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात केंद्र पुरस्कृत योजना (राज्य हिस्सा) लेखाशिर्ष सांकेतांक क्रमांक २२१०५१५७ व २२१०५१६६ मधून तसेच जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत मुख्यलेखाशिर्ष २२२५ ई उपलेखाशिर्ष टीआर-२२०००२ (टीएसपी) व टीआर-२२०००५ (ओटीएसपी) या लेखाशिर्षामधून संबंधित जिल्हयाच्या जिल्हास्तरावर टीएसपी व ओटीएसपी अंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या राज्य योजनेअंर्तगत योजनेमध्ये असलेल्या मंजूर व उपलब्ध अनुदानामधून भागविण्यात यावा.

३) सदरहू अळिनाशके व किटकनाशके यांचे तांत्रिक विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी व त्यानंतरच या बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रसिध्द करण्यात यावी.

४) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारित नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणा-या बाबींचा खरेदी झाल्यानंतर त्याची साठवणूक व वितरण (Storage & distribution) करणे तसेच पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तूंची (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाब विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहित मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) निविदा प्रक्रिया पुर्ण झाल्यांनतर केंद्रीय खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

८) तसेच सदर बाबींच्या खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपुर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) दिनांक २६.०७.२०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनूसार कार्यवाही करण्यात यावी.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते १० येथे नमूद अटींची पुर्तता करण्याची संपुर्ण जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुख यांची तसेच आरोग्य सेवा संचालनालयाची राहील.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला,

उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२२१२२१२०८११७ हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2018.11.27 15:53:57 +05'30'

**(व. मुं. भरोसे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११) निवडनस्ती (आरोग्य-८)